GR-20040730122359001-1201

जिल्हा परिषदा मार्फत मान्यता प्राप्त सहकारी मजुर संस्थांना देण्यात येणा-या कामाच्या किंमतीत रु. दोन लाखावरुन रुपये पाच लाखापर्यंत वाढ करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

ग्राम विकास व जलसंधारण विभाग,

शासन निर्णय क्रमांक झेडपीए २०००/प्र.क्र.११/३३,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ८ मार्च, २०००.

**संदर्भ** :- १)शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक झेडपीए १०८५ /सीआर १६३७(२८)/५७, दिनांक-. २ जुलै, १९८५

२)शासन अधिसुचना, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.झेडपीए १०९९/प्र.क्र.११०३/३३, दिनांक- ३१ जुलै, १९९९

३)शासन निर्णय क्रमांक, सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.एलएबी१०९८/प्र.क्र.१६४/इमारती-२, दिनांक- ११ जानेवारी, २०००.

**प्रस्तावना** :-

शासनाच्या संदर्भाधीन क्र.१ च्या शासन निर्णयान्वये जिल्हा परिषदांमार्फत मान्यता प्राप्त सहकारी मजुर संस्थांना देण्यात येणा-या कामाच्या किंमतीत रुपये दोन लाखापर्यंत वाढ करण्यात आली. त्यानंतर संदर्भाधीन क्र. २च्या अधिसूचनेद्वारे कामे / विकास योजना यांच्या संबंधातील प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार व कामे/ विकास योजनांच्या निविदा किंवा करार स्विकारण्याच्या अधिकारात वाढ करण्यात आलेली आहे. सार्वजनिक बांधकाम विभागाने संदर्भाधीन क्र.३ मधील आदेशान्वये मजूर सहकारी संस्थांना देण्यात आलेल्या सवलतीत वाढ करण्याचे आदेश निर्गमित केलेले आहे. सदर आदेश जिल्हा परिषदेना लागु करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. सदर प्रस्तावाचा सर्वांगीन विचार करुन शासन खालील प्रमाणे आदेश देत आहे.

**शासन निर्णय** :-महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती कायदा १९६१ चे कलम १२५ ते १२७ चे अधिनराहून त्याचप्रमाणे महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती लेखा संहिता १९६८ चे नियम १३७ आणि १३८ ते १४९ यांना अधिन राहुन रुपये ५ लक्ष किंमती पर्यंतची कामे मजुर सहकारी संस्थांना निविदा न मागविता देण्याबाबतच्या शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग क्र.एलएबी-१०९८/प्र.क्र.१६४/इमारती-२ दि. ११ जानेवारी, २००० आवश्यक त्या फेरफारासह जशाच्या तसा जिल्हा परिषदेस लागु करण्यात येत आहे. याबाबत आवश्यक ती दुरुस्ती महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती लेखा संहिता १९६८ मध्ये योग्य वेळी करण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(जयश्री चौधरी)

सहसंचालक व उपसचिव

महाराष्ट्र शासन

प्रति

१. वित्त विभाग , मंत्रालय, मुंबई

२. सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

३. कृषी फलोत्पादन व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.

४. पाटबंधारे विभाग, मंत्रालय, मुंबई.

५. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

७. सहकार व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. सर्व विभागीय आयुक्त.

९. सर्व जिल्हा परिषदा

१०.महालेखापाल-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

११.महालेखापाल-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर

१२.सहकार आयुक्त व निबंधक सहकारी संस्था , महाराष्ट्र राज्य, पुणे.

१३.सहनिबंधक, मुंबई /पुणे/ नागपूर/ औरंगाबाद/नाशिक/अमरावती.

१४.अधीक्षक अभियंता, मजुर सहकारी संस्था द्वारा आयुक्त व निबंधक सहकारी संस्था , पुणे.

१५.सर्व जिल्ह्याचे उप निबंधक, सहकारी संस्था.

१६.मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.

१७.ग्राम विकास व जलसंधारण विभागातील सर्व अधिकारी व कार्यासने/ मुख्य टंकलेखिका